**पूरक पोषण आहार योजनेंतर्गत लाभार्थ्यांना वितरीत करावयाच्या खिचडीकरीता लागणारी तूरडाळ महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांचेकडून पुरवठा तसेच कार्यपध्दती निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक: एबावि-२०१७/प्र.क्र.१३६/का-५**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १९ जून, २०१८

वाचा :-(१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक सपस २०१७/प्रक्र १९८/२४स, दिनांक २३ ऑक्टोबर,२०१७, दिनांक १६.४.२०१८ व दिनांक २०.४.२०१८

(२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एबावि-२०१७/प्रक्र १३६/का-५, दिनांक ७ मे,२०१८.

(३) महिला व बाल विकास विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक एबावि-२०१७/प्रक्र १३६/का-५, दिनांक ९ मे,२०१८.

(४)सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,शासन निर्णय क्रमांक सपस-२०१७/ प्रक्र.१९८/२४स, दिनांक १२ जून,२०१८.

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत पुरक पोषण आहार योजनेंतर्गत लाभार्थ्यांना वितरीत करावयाच्या खिचडी या आहाराकरीता राज्यातील ग्रामीण व नागरी भागातील अंगणवाडी केंद्रावर आवश्यक असणारी तुरडाळ ही राज्य शासनाने आधारभूत किंमत योजनेंतर्गत राज्यातील शेतकऱ्यांकडून खरेदी केलेल्या तूरीपासून महाराष्ट्र राज्य सहाकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांचे मार्फत भरडाई करुन विक्रीकरीता उपलब्ध करुन दिलेल्या तुरडाळीमधून खरेदी करण्यास उपरोक्त संदर्भीत शासन निर्णय क्रमांक १ नुसार मान्यता देण्यात येवून उपरोक्त संदर्भीत क्रमांक (२) व (३) नुसार क्रमांक १ च्या शासन निर्णयाबाबत शुध्दीपत्रक निर्गमीत करण्यात आले होते.

मंत्रीमंडळाच्या दिनांक २९ मे,२०१८ रोजी झालेल्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने उपरोक्त संदर्भीत क्रमांक (४) नुसार निर्गमीत केलेल्या शासन निर्णयास अनुसरुन महिला व बाल विकास विभागाने याप्रकरणी उपरोक्त क्रमांक (१) नुसार निर्गमीत केलेल्या शासन निर्णयासंदर्भात खालीलप्रमाणे शुध्दीपत्रक निर्गमीत करण्यात येत आहे.

**शासन शुध्दीपत्रक**:-

केंद्र पुरस्कृत पूरक पोषण आहार योजनेंतर्गत राज्यातील लाभार्थ्यांना वितरीत करावयाच्या खिचडीकरीता तुरडाळीची खरेदी ही राज्य शासनाने आधारभूत किंमत योजनेंतर्गत राज्यातील शेतक-यांकडून खरेदी केलेल्या तूरीपासून **महाराष्ट्र राज्य सहाकारी पणन महासंघ मर्या., मुंबई** यांचेमार्फत भरडाई करुन विक्रीकरीता उपलब्ध करुन दिलेल्या तुरडाळी संदर्भात सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने दिनांक १२ जून, २०१८ च्या शासन निर्णयाप्रमाणे प्रती किलोग्रॅम रु.५५/- याप्रमाणे खरेदी करण्यास मान्यता देण्यात येत आहे. **(तूरडाळीच्या प्रती किलोग्रॅम रुपये ५५/- किंमतीमधील रु.५/- इतका खर्च हा प्रकल्पापासून अंगणवाडी केंद्रापर्यंत तूरडाळीची वाहूक करण्यासाठी देण्यात येईल**).

२. यानुसार खरेदी केलेल्या तूरडाळीकरीता व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मर्या. यांना प्रती किलोग्रॅम रु.५०/- या दराने देयकाची एकूण रक्कम अदा करावी. तसेच रु.५५/- प्रती किलोग्रॅम इतक्या किंमतीमधून रु.५/- इतकी रक्कम वाहतूक खर्च म्हणून वळती करण्यास शासन मान्यता देत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१९१४३३४२९५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vinita Ved
Singal

Digitally signed by Vinita Ved Singal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bf34546cd1b83b57211a632b3065e76e8b0e2804e764de6b63b724785393c565, cn=Vinita Ved Singal
Date: 2018.06.19 14:33:12 +05'30'

**( विनिता वेद सिंगल )**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री/राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधानपरिषद), विधानभवन,मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्य, मंत्रालय, मुंबई-३२
६) अतिरिक्त मुख्य सचिव (पणन), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) सचिव (महिला व बालविकास विभाग), मंत्रालय, मुंबई.
८) सह सचिव (श्री गुजर)/ उप सचिव (श्रीम.निवतकर), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) व्यवस्थापकीय संचालक, दि महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., कन्मूर हाऊस, मसजीद बंदर, मुंबई.
१०) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई.
११) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) सर्व जिल्हाधिकारी.
१३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१४) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास.
१५) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी(जिल्हा परिषद).
१६) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी ).
१७) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२१) सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२) निवड नस्ती (कार्यासन-५), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

-----------